**निधी वितरण-शासन घोषित किमान आधारभुत किंमत ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आधारित दरापेक्षा जास्त असल्यास त्यामधील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१३८/१ अे**

मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा:-**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.:-संकीर्ण २७१७/ प्र.क्र.१९९/१अे, दि. १७.९.२०१८.
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.:-संकीर्ण २७१९/ प्र.क्र.१३८/१अे, दि. ३०.१२.२०१९.
३. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.कृआ/गुनि/१/२/एमएसपी/२०१९/१०५७८, दि.२७.१२.२०१९
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.कृआ/गुनि/१/२/एमएसपी/२०२०/५९५०, दि.१२.०२.२०२०
५. राज्यस्तरीय समितीच्या दि.२०.०३.२०२० रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

कृषि उत्पादित पिकांकरीता कृषि उत्पन्न बाजार समितीमधील दर हा किमान आधारभुत किमतीपेक्षा कमी असल्यामुळे राज्यातील बिजोत्पादन कार्यक्रमात स्थिरता येण्याच्या दृष्टीने तसेच, शेतकऱ्यांचा बिजोत्पादन कार्यक्रमातील सहभाग कायम राखण्याच्या दृष्टीने दिनांक १७ सप्टेंबर,२०१८ च्या शासन निर्णयानुसार शासन घोषित किमान आधारभुत किंमत ही विहित कालावधीतील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आधारित दरापेक्षा जास्त असल्यास त्यामधील फरकाची रक्कम महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, अकोला आणि राष्ट्रीय बियाणे महामंडळ, पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबतची नवीन योजना लागू करण्यात आलेली आहे.

सन २०१८-१९ च्या खरीप/रब्बी बिजोत्पादन घेतलेल्या शेतकऱ्यांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारित दर व शासन घोषित किमान आधारभूत किंमत (MSP) यामधील फरकाची रक्कम देणेसाठी एकूण रू. १२०.७६ लाख रकमेच्या अनुदानास मान्यता देण्यासाठी राष्ट्रीय बीज निगम,पुणे यांचा प्रस्ताव कृषि आयुक्तालय, पुणे यांचेकडून वाचा क्र.४ अन्वये प्राप्त झालेला होता. सदर प्रस्तावास राज्यस्तरीय समितीच्या दि.२०.०३.२०२० रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आलेली आहे. यास अनुसरून रू.१२०.७६ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

खरीप व रब्बी हंगाम २०१८-१९ मध्ये उत्पादित झालेल्या बिजोत्पादक शेतकऱ्यांच्या बियाणांना कृषि उत्पन्न बाजार समिती आधारित दर आणि शासन घोषित किमान आधारभुत किंमत यामधील फरकाची रक्कम राष्ट्रीय बीज निगम,पुणे यांच्या बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्यासाठी लेखाशिर्ष २४०१ A९२२ (१००% राज्य योजना) अंतर्गत रू.१२०.७६ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च हा सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३-२४०१, पिक संवर्धन, १०३, बी-बियाणे,
(००)(२८) किमान आधारभुत किंमत (MSP) आणि कृषि उत्पन्न बाजार समिती आधारभूत दर यामधील फरकाची रक्कम बिजोत्पादक शेतकऱ्यांना देण्याबाबत,(१०० टक्के राज्य कार्यक्रम)
३३- अर्थसहाय्य, (२४०१ A९२२)

३. सदर फरकाची रक्कम थेट लाभ हस्तांतरद्वारे बीजोत्पादक शेतकऱ्यांच्या आधार लिंक बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावी, हा निधी PLA/बॅक खात्यामध्ये ठेवल्या जाणार नाही यांची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D/मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक /तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियमांचा/ अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

५. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व त्यांचे कार्यालयातील सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१५८/२०२०/व्यय-१, दि.३१.०८.२०२० अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार काढण्यात येत आहेत. तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं -२०२०/ प्र.क्र.६५/अर्थ ३, दिनांक ०४.०५.२०२० व दिनांक २६.०५.२०२० मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०२०१००९१६३००४७१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.10.09 16:31:49 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०००३२.

३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई, ४०००३२.
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई, ४०००३२.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०. सर्व प्रकल्प संचालक, आत्मा.
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई, ४०००३२.
१४. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई, ४०००३२.
१५. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई, ४०००३२.